“गीता नगर, कुलाबा, मुंबई येथील संरक्षक भिंतीची दुरुसती करणे” या कामाच्या रू.२९,४३,६३,४६७/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१०२३/प्र.क्र.१५८/बंदरे-१**
**गृह विभाग, मंत्रालय**
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १० जुलै, २०२४.

**वाचा :-** १) कृषि व पुदम विभाग, शा.ज्ञापन क्र. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, शासन ज्ञापन क्र.मत्स्यवि-११२/प्र.क्र.५०/पदुम-१४, दि.२४.०२.२०२४
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. मसामं/मुकाअ/अभि-२/४९९४, दि.०९.१०.२०२३.

**प्रस्तावना:-**

“ट्रॉम्बे, कुर्ला मुंबई उपनगर येथील जेट्टीचा विस्तार करणे” हे रू.३०.०० कोटी किंमतीचे काम सन २०२३-२४ मध्ये राज्य योजनेअंतर्गत शासनाच्या बंदरे विभागाकडे प्रस्तावित करण्यात आले होते. तथापि, ट्रॉम्बे, मुंबई येथे मासळी उतरविण्याच्या ठिकाणी मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा उभारण्याच्या कामाचे सर्वेक्षण अहवाल तयार करण्याच्या अंदाजपत्रकास मत्स्यव्यवसाय विभागाकडून दि.२४.०२.२०२३ च्या शासन ज्ञापनान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सबब, ट्रॉम्बे, मुंबई येथील काम मत्स्यव्यवसाय विभागाव्दारे करण्यात येत असल्याने, सदरचे बंदरे विभागाकडे प्रस्तावित केलेले काम रद्द करून त्याऐवजी गीतानगर, कुलाबा येथील संरक्षक भिंतीची दुरूस्ती करणे हे काम महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांच्यामार्फत प्रस्तावित करण्यात करण्यात आले. सदर कामांच्या रू.२९,४३,६३,४६७ (रूपये एकोणतीस कोटी त्रेचाळीस लाख त्रेसष्ट हजार चारशे सदुसष्ठ मात्र) एवढ्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

गीता नगर, कुलाबा, मुंबई येथील संरक्षक भिंतीची दुरूस्ती करणे या कामाच्या रू.२९,४३,६३,४६७ (रूपये एकोणतीस कोटी त्रेचाळीस लाख त्रेसष्ट हजार चारशे सदुसष्ठ मात्र) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. CRZ परवानगी प्राप्त करुन घेण्यात यावे.
२. CRZ परवानगीशिवाय कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नये.
३. केंद्र शासन व राज्य शासनाच्या व इतर सर्व आवश्यक परवानग्या प्राप्त करुन घेण्यात यावे.
४. प्रत्यक्ष निविदा प्रक्रिया करण्यापूर्वी अंदाजपत्रक अद्ययावत असल्याची खात्री करण्यात यावी.
५. प्रत्यक्ष काम आय.आय.टी., मुंबई यांचे अहवाल/सल्ल्यानुसार करुन घेण्यात यावे.
६. सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.
७. योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहीत निविदा कार्यपध्दती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी महाराष्ट्र सागरी मंडळाची राहील.
८. सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रीय निर्णय किंवा अनियमितता यांस मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमांनुसार करण्याची जबाबदारी महाराष्ट्र सागरी मंडळाची राहील.

वरील अटींची पुर्तता होईल याबाबतची दक्षता महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांनी घ्यावी.

२. त्या-त्या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययातून प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांसाठी नियतव्यय उपलब्ध करण्याबाबत महाराष्ट्र सागरी मंडळाने नियोजन करावे.

३. वरील कामावरील खर्च मागणी क्र.बी-७, ३०५१-बंदरे व दिपगृहे, ८०- सर्व साधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०२) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्य अनुदान तरंगती जेट्टी व तत्सम सुविधा पुरविणे (कार्यक्रम) (३०५११८३५) या लेखाशिर्षाखाली ३५, -भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उद्दिष्टाखालील मंजूर तरतुदींतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ५३/रा.मं १, दि.११.०१.२०२४ व नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.३०/१४६१, दिनांक २५.०१.२०२४ तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३४१/२०२४/व्यय-८, दिनांक ११.०६.२०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रकल्पाचे व्यस्थापन सुरळीत होण्याकरीता या क्षेत्रात अनुभवी व प्रगल्भ सलागाराच्या मदतीने निविदा तयार करुन, निविदा प्रकीया राबविणेबाबत आवश्यक कार्यवाही करण्याची दक्षता महाराष्ट्र सागरी मंडळाने घ्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१०११५९०४१०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MURLIDHAR
MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=282312ebca8590dedb8028575064d7754a3c5702d668b43d226ef7b32ee3a517, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2024.07.10 12:10:22 +05'30'

**( मुरलीधर मुंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
६. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
७. प्रधान सचिव (बंदरे), मंत्रालय, मुंबई,
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
९. निवडनस्ती(बंदरे-१)